१) ज्ञानज्योत ग्रामीण विकास बहुउददेशिय सेवाभावी संस्था,संचलित,जयशिवाजी मूकबधिर विद्यालय, कंधार, २) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, जयसंभाजी मूकबधिर विद्यालय, लोहा, ३) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,गुरु रविदास मतिमंद विद्यालय, लोहा आणि ४) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,निवासी मतिमंद विद्यालय, चाकूर, जि.लातूर या ४ विशेष प्रवर्गाच्या शाळांना विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्र.इडीडी २०२०/प्र.क्र.६७/दि.क.१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०२१.

वाचा:- १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २००१/ प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९.७.२००३ व समक्रमांक शासन पुरकपत्र दि.४.१२.२००३.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग क्र.इडीडी २००३/प्र.क्र.३४०/भाग-२/सुधार-२, दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६.
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.दिकआ/ज्ञानज्योत व इतर/विशेष बाब/अनुदान/२०२१-२२/३९४७/पुणे, दि.१६.६.२०२१.

प्रस्तावना :-

१) ज्ञानज्योत ग्रामीण विकास बहुउददेशिय सेवाभावी संस्था,संचलित,जयशिवाजी मूकबधिर विद्यालय, कंधार, २) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, जयसंभाजी मूकबधिर विद्यालय, लोहा, ३) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,गुरु रविदास मतिमंद विद्यालय, लोहा आणि ४) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,निवासी मतिमंद विद्यालय, चाकूर, जि.लातूर या चार विनाअनुदान तत्वावरील शाळांना विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

(१) ज्ञानज्योत ग्रामीण विकास बहुउददेशिय सेवाभावी संस्था,संचलित,जयशिवाजी मूकबधिर विद्यालय, कंधार या मुकबधीर प्रवर्गाच्या विशेष शाळेला ५० निवासी विनाअनुदानीत तत्तावर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र क्र.एल-००५, दि.२९.५.२०१५ व

(२) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, जयसंभाजी मूकबधिर विद्यालय, लोहा या मुकबधीर प्रवर्गाच्या विशेष शाळेला ८० निवासी विनाअनुदानीत

तत्तावर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र क्र.एल-०००६, दि.२९.५.२०१५ व

(३) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,गुरु रविदास मतिमंद विद्यालय, लोहा या मतीमंद प्रवर्गाच्या विशेष शाळेला ८० निवासी विनाअनुदानीत तत्तावर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र क्र.एल-००७, दि.२९.५.२०१५ व

(४) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,निवासी मतिमंद विद्यालय, चाकूर, जि.लातूर या मतीमंद प्रवर्गाच्या विशेष शाळेला ५० निवासी विनाअनुदानीत तत्तावर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र क्र.एल-०१२, दि.१८.६.२०१५ रोजी विनाअनुदान तत्वावर शाळेस मान्यता प्रदान करण्यात आली असून प्रचलित पध्दती व आवश्यकतेप्रमाणे तसेच उपलब्ध निधीप्रमाणे अनुदानित संस्था मान्य करण्याच्या मागणीनुसार व मागासलेले भागात अनुदानित निवासी शैक्षणिक संस्था देण्याच्या विनंतीनुसार सदरहू शाळांना एक विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत :-**

१) सदर शाळेस/कार्यशाळेस शासनाने वेळोवेळी निश्चित करतील अशा अटी व शर्ती लागू राहतील.

२) सदर शाळेस/कर्मशाळेस अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून, याअनुषंगाने वेतनेत्तर अनुदान व पदनिर्मितीबाबत वित्त विभाग व उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेच्या अटींच्या अधीन राहून सदरहू मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३) सदर शाळेस/कर्मशाळेस सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.८.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील प्रपत्र-ब व प्रपत्र-क मध्ये विहित केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील.

४) सदर अपंगांच्या विशेष शाळा/कर्मशाळांना केंद्र शासन स्थानिक स्वराज्य संस्थांकडून किंवा इतर संस्थांकडून नियमित अनुदान मिळत आहे असे निदर्शनास आल्यास सदर संस्था राज्य शासनाचे अनुदान मिळण्यास अपात्र ठरेल.

५) शासनाने अनुदान तत्वावर आणण्याकरीता वेळेवेळी विहित केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीचे पालन झालेले नाही असे आढळून आल्यास त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

६) सदरहू चारही शाळांना त्यांच्या मान्य विद्यार्थी संख्येवर अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून दि.१८.८.२००४ च्या आकृतीबंधानुसार आवश्यक असणारा कर्मचारी वृदांबाबतचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा. सदर मान्यतेशिवाय सदर पदांना पदमान्यता देण्यात येऊ नये.

७) मा.न्यायालयात दाखल असलेल्या रिट याचिका क्र.६९०/२०१३ डॉ.बाबासाहेब परांजपे प्रतिष्ठान आंबेजोगाई विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.३.९.२०१३ अन्वये शासनाने अपंगांच्या विशेष शाळा/कार्यशाळांच्या अनुदानाबाबत धोरण ठरविण्याचे आदेश दिले आहेत. सदर धोरणातील निकषांच्या अधिन राहून सदर शाळेस अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

८) १) ज्ञानज्योत ग्रामीण विकास बहुउददेशिय सेवाभावी संस्था,संचलित,जयशिवाजी मूकबधिर विद्यालय, कंधार, २) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, जयसंभाजी मूकबधिर विद्यालय, लोहा, ३) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,गुरु रविदास मतिमंद विद्यालय, लोहा आणि ४) सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,निवासी मतिमंद विद्यालय, चाकूर, जि.लातूर या चार विनाअनुदान तत्वावरील शाळांना “अ” श्रेणी प्राप्त असल्याने व प्रचलित पध्दती व आवश्यकतेप्रमाणे तसेच उपलब्ध निधीप्रमाणे अनुदानित संस्था मान्य करण्याच्या मागणीनुसार व मागासलेले भागात अनुदानित निवासी शैक्षणिक संस्था देण्याच्या विनंतीनुसार मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या मान्यतेने “विशेष बाब” म्हणून सदरहू चारही शाळांना मान्यता देण्यात येत आहे. परंतु यापुढे इतर अपंगांच्या शाळा/कर्मशाळांच्या मान्यतेसाठी ही बाब लागू असणार नाही व हे प्रकरण पुर्वोउदाहरण म्हणून देता येणार नाही.

२. सदर शासन निर्णय हा मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२११८२५३०६३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.21 18:26:50 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
४) अपर मुख्य सचिव (सा.न्या.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
५) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर
७) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर/नांदेड

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर /नांदेड
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर/नांदेड
११) अध्यक्ष/सचिव, ज्ञानज्योत ग्रामीण विकास बहुउददेशिय सेवाभावी संस्था, संचलित, जयशिवाजी मूकबधिर विद्यालय, कंधार,
१२) अध्यक्ष/सचिव, सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, जयसंभाजी मूकबधिर विद्यालय, लोहा,
१३) अध्यक्ष/सचिव, सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,गुरु रविदास मतिमंद विद्यालय, लोहा
१४) अध्यक्ष/सचिव, सम्राट अशोक रेड्डी, शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित,निवासी मतिमंद विद्यालय, चाकूर, जि.लातूर
१५) निवड नस्ती, अपंग कल्याण-१.

****